**मंत्रालयीन विभागातील लिपिक-टंकलेखक सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा सन २०२४ च्या आयोजनाबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्र. सेप्रप-१९२३/प्र.क्र.३१/का.१७**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १९ ऑगस्ट, २०२४

**शासन परिपत्रक :-**

लिपिक-टंकलेखक यांच्या सन २०२४ च्या सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षेचे आयोजन खालील वेळापत्रकानुसार करण्यात येत आहे.

| परीक्षेचे स्थळ, वार व दिनांक | परीक्षेची वेळ | पेपर क्रमांक व गुण | पेपरचा विषय |
|---|---|---|---|
| • **स्थळ-** श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महाविद्यालय, चर्चगेट, मुंबई.<br>• **वार- रविवार**<br>• **दिनांक- २२ सप्टेंबर, २०२४** | सकाळी ११.०० ते दुपारी १.०० | पेपर क्र.१ गुण १०० | **पुस्तकांशिवाय-** मंत्रालयीन रचना, महाराष्ट्र शासन कार्यनियमावली, मंत्रालयीन अनुदेश, विधानमंडळ कामकाज,<br>लिपिकांची कार्ये व कर्तव्ये इतर. |
| | दुपारी २.३० ते दुपारी ४.३० | पेपर क्र.२ गुण १०० | **पुस्तकांसह**- म.ना.से. ( वर्तणूक ) नियम, म.ना.से. (शिस्त व अपील) नियम, महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५<br>सार्वजनिक अभिलेख अधिनियम, २००५ व इतर |
| | | | **पुस्तकांशिवाय**- सेवापुस्तकातील नोंदी, रजेचे प्रकार व राष्ट्रीय निवृत्ती योजना |

**टीप-** प्रत्येक प्रश्नपत्रिकेत वस्तुनिष्ठ प्रश्नांना ६० गुण व लघुत्तरी/दिर्घोत्तरी प्रश्नांना ४० गुण याप्रमाणे प्रश्नपत्रिकेचे स्वरूप असेल.

**ब) सदर परीक्षेसाठी उमेदवारांना खालील सूचना देण्यात येत आहेत.**

१) परीक्षेच्या वेळी प्रत्येक उमेदवाराने स्वत:चे शासकीय ओळखपत्र सोबत ठेवणे बंधनकारक आहे.
२) परीक्षा केंद्रातील सूचना फलकानुसार उमेदवारांची बैठक व्यवस्था असेल.
३) परीक्षा सुरु होण्यापूर्वी ४५ मिनिटे अगोदर उमेदवाराने परीक्षेच्या केंद्रावर हजर रहावे.
४) परीक्षा सुरु झाल्यावर कोणत्याही उमेदवारास परीक्षा कक्षामध्ये प्रवेश दिला जाणार नाही.

५) प्रत्येक पेपर सुरु होण्याचा इशारा तसेच पेपर सपंण्याचा इशारा दहा मिनिटे अगोदर घंटा देऊन करण्यात येईल.

६) उत्तरपत्रिका लिहिण्यास सुरुवात करण्यापूर्वी उत्तरपत्रिकेच्या मुखपृष्ठावरील आवश्यक सर्व तपशील उमेदवारांनी अचूकपणे भरणे आवश्यक आहे. मुखपृष्ठाच्या मागील बाजूस उमेदवाराने कोणतेही लिखाण करु नये. उत्तरपत्रिकेच्या आतील पानांवर तसेच पुरवणीवर उमेदवाराने स्वत:चे नाव, स्वाक्षरी, आसन क्रमांक इत्यादी कोणताही मजकूर लिहू नये. उत्तरपत्रिका/प्रश्नपत्रिकेच्या कोणत्याही भागावर उमेदवाराने स्वाक्षरी करु नये. तसेच सही करणे किंवा ओळख पटवून देण्यासाठी काही विशिष्ट चिन्हांचा / खुणांचा निर्देश करणे ही बाब आक्षेपार्ह समजण्यात येईल व त्या प्रकरणी खालील नमूद अ.क्र.९ प्रमाणे कार्यवाही करण्यात येईल.

७) उमेदवाराने उत्तरपत्रिकेच्या पृ. क्र. १ ते ४ वगळून इतर सर्व पृष्ठांवरील दोन्ही बाजूस उत्तरे लिहावीत.

८) परीक्षेसाठी विहित केलेली अधिकृत शासकीय पुस्तके/अधिनियम/नियम/शासन निर्णय त्या त्या पेपरच्या वेळी उमेदवारांना परीक्षा कक्षात वापरण्याची परवानगी राहील. विहित केलेली मुळ पुस्तके उपलब्ध नसल्यास, संबंधित विभागाच्या आस्थापना अधिकाऱ्यांनी प्रमाणित करुन दिलेल्या विहित पुस्तकांच्या झेरॉक्स प्रती परीक्षेच्या वेळी वापरण्यास परवानगी राहील. मात्र परीक्षेसाठी विहित केलेल्या पुस्तकांमध्ये अथवा पुस्तकांच्या झेरॉक्स प्रतींवर अथवा अधिनियम/नियम/शासन निर्णयाच्या प्रतींवर इतर कोणत्याही प्रकारचे लिखाण केलेले नसावे.

९) उमेदवारांनी परीक्षा दालनात कोणत्याही प्रकारचे आक्षेपार्ह वर्तन करु नये. परीक्षेच्या वेळी आक्षेपार्ह वर्तन { कॉपी करणे/ बघून लिहिणे/ अन्य उमेदवारांच्या उत्तरपत्रिकेतून अथवा त्यांच्याशी चर्चा करुन उत्तर लिहिणे, परीक्षा दालनात भ्रमणध्वनी (मोबाईल), पेजर अथवा अन्य इलेक्ट्रॉनिक उपकरणे जवळ बाळगणे इत्यादी } करणाऱ्या उमेदवारास संबंधित प्रश्नपत्रिकेत अनुत्तीर्ण घोषित करण्यात येईल तसेच त्यावर्षीच्या उर्वरीत प्रश्नपत्रिकांना बसण्यासाठी अपात्र ठरविण्यात येईल.

१०) परीक्षा संपण्याच्या १० मिनिटे अगोदर उमेदवारांनी आपली उत्तरपत्रिका व पुरवणी एकत्र बांधून घ्यावी.

११) परीक्षा सुरु असताना आणि परीक्षा संपल्यानंतर समवेक्षकांनी परवानगी दिल्याखेरीज जागा सोडू नये.

१२) उत्तरपत्रिका लिहीण्यासाठी सक्षम नसलेल्या दिव्यांग व्यक्तींना लेखनिक उपलब्ध करून देणेबाबत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांनी दि. ५ ऑक्टोबर, २०२१ रोजीच्या शासन परिपत्रकानुसार, “दिव्यांग व्यक्तींच्या बाबत लेखी परीक्षा घेण्याबाबतची मार्गदर्शिका, २०२१” सुचित केलेली आहे. ज्या दिव्यांग उमेदवारांना लिपिक-टंकलेखक सेवाप्रवेशोत्तर परीक्षा २०२४ साठी लेखनिकाची आवश्यकता आहे त्यांनी उपरोक्त शासन परिपत्रकातील तरतूदींनुसार आवश्यक कागदपत्रांसह आपल्या विभागामार्फत सामान्य प्रशासन विभाग/वि.भा.प. (का.१७) कडे अर्ज सादर करावा.

१३) सदर परीक्षेच्या प्रत्येक प्रश्नपत्रिकेसाठी २ तास इतका वेळ निर्धारित करण्यात आलेला आहे.

२. मंत्रालयीन प्रशासकीय विभाग यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सदर परिपत्रक परीक्षेला प्रवेश दिलेल्या सर्व उमेदवारांच्या ( जे उमेदवार रजेवर/प्रतिनियुक्तीवर असतील त्यांच्यासह ) तातडीने

लेखी स्वरुपात निदर्शनास आणून, त्याबाबतची नोंद आपल्या विभागाच्या अभिलेखात जतन करुन ठेवावी. याबाबत दिरंगाई होणार नाही याची संबंधित विभागाच्या आस्थापना शाखेने दक्षता घ्यावी.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२४०८१९१७४९३९४८०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SMITA PRASAD JOSHI

Digitally signed by SMITA PRASAD JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISRTATION DEPARTMENT, 2.5.4.20=d759e39e5163375d3782e5f6bef7edf6a25c72797123cdaa86acd09edf52baf1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=28AA5752FA66D3A7FDEAFB1F4AB24CD90FD9D667A6880CB8CCECA18276150ACA, cn=SMITA PRASAD JOSHI
Date: 2024.08.20 11:19:57 +05'30'

**( स्मिता जोशी )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सर्व मंत्रालयीन विभाग ( आस्थापना )
२. निवडनस्ती